जलसंपदा विभागासाठी “Online Estimate and Contract Management (EstiCoM)” प्रणाली विकसित करण्यासाठी स्थापन केलेल्या “EstiCoM प्रणाली सनियंत्रण समिती अंतर्गत उपसमितीची (Domain Sub-Committee) स्थापना करणेबाबत”

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ई प्रशासन २०१६(१२४/२०१६)/निवसं-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दि . ०२ ऑगस्ट, २०१७

वाचा:- १. शासन निर्णय क्र .ई-प्रशासन २०१६(२३६/१६) लपा १-दिनांक ०२/०९/२०१६
२. शासन निर्णय क्र .ई-प्रशासन २०१६(२३६/१६) लपा १-दिनांक ०१/१०/२०१६
३. अधिक्षक अभियंता ई-प्रशासन मंडळ यांचे पत्र क्र.ईप्रमं/(५३/१६)/२०१६ दि.१२.७.२०१७

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथिल शासन निर्णयान्वये “Online Estimate and Contract Management (EstiCoM)” प्रणाली विकसित करण्यासाठी “EstiCoM प्रणाली संनियंत्रण समिती” गठीत करण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये सदर समितीची पुनर्रचना करण्यात आली असून EstiCoM प्रणाली संनियंत्रण समितीने विकसित करावयाच्या प्रणालीसाठी कामाची व्याप्ती व कामाचे व्यापक स्वरुप पाहता गठीत केलेल्या समितीच्या अंतर्गत उपसमितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

EstiCoM प्रणाली संनियंत्रण समितीने विकसित करावयाच्या प्रणालीसाठी कामाची व्याप्ती व कामाचे व्यापक स्वरुप पाहता EstiCoM प्रणाली संनियंत्रण समिती अंतर्गत पुढील प्रमाणे उप समितीची स्थापना करण्यात येत आहे. सदर उप समितीमध्ये जलसंपदा विभागामध्ये कार्यरत असणा-या तसेच निवृत्त झालेल्या खालील अधिकाऱ्यांचा समावेश करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्यांचे नांव | पदनाम | उप समितीमधील पदनाम |
|---|---|---|---|
| १ | श्री. संजय बोडखे | कार्यकारी अभियंता | अध्यक्ष |
| २ | श्री. अभय काटकर | कार्यकारी अभियंता | सदस्य सचिव |
| ३ | श्री. पृथ्वीराज फाळके | कार्यकारी अभियंता | सदस्य |
| ४ | श्री .रोहित पोळ | उप अभियंता | सदस्य |
| ५ | श्री .विशाल खैरनार | उप अभियंता | सदस्य |
| ६ | श्री. प्रकाश भगवानराव फंड | निवृत्त उप विभागीय अभियंता | सदस्य |

**अ.) उप समितीची कार्ये:-**

१. Requirement Gathering Templates (RGT) तयार करणे.
२. EstiCoM प्रणालीसाठी Module निहाय आवश्यक Master Data Dictionary तयार करणे.
३. निवड केलेल्या पथदर्शी प्रकल्पांसाठी (Pilot Project) प्रणालीची (EstiCoM Software) चाचणी घेणे.
४. क्षेत्रीय अधिकाऱ्यांच्या सहकार्याने User Acceptance Testing (UAT) घेणे.
५. विकासकामार्फत तयार करण्यात आलेल्या User Manual ची पडताळणी करणे.

**आ.) उप समितीची कार्यपद्धती व बैठका:-**

EstiCoM प्रणाली संनियंत्रण समितीच्या अध्यक्षांच्या निर्देशानुसार उप समितीची कार्यपद्धती निश्चित करण्यात यावी. समितीच्या बैठका EstiCoM प्रणाली संनियंत्रण समितीचे अध्यक्ष यांच्या निर्देशानुसार तसेच आवश्यकतेनुसार आयोजित केल्या जाव्यात. समितीच्या बैठकीच्या कामकाजासाठी गणपुर्तीची अट असणार नाही. उपसमितीने EstiCoM प्रणाली संनियंत्रण समितीने निश्चित केलेल्या कालमर्यादेनुसार कार्यवाही होत असल्याबाबत खातरजमा करावी.

**इ.) उप समितीचा कार्यकाळ :-**

उप समितीचा कार्यकाळ स्थापना आदेशाच्या दिनांकापासून EstiCoM प्रणालीचे काम पूर्ण होई पर्यंत राहील. उप समितीने विहित केलेल्या कार्याच्या अनुषंगाने व EstiCoM प्रणाली संनियंत्रण समितीच्या सूचनेप्रमाणे कार्यवाही करावी.

**ई.) निवृत्त अधिकारी यांचे मानधन :-**

निवृत्त अधिकारी यांनी विहित कार्यपालन केल्यावर त्यांना वित्त विभाग शा. नि. क्र.शासाउ-१०.१०/ प्र.क्र.९६/१०/सा.उ. दि.१३.३.२०१२ व वित्त विभाग शा. नि. क्र. मु.वि.नि १०९५/प्र.क्र.१२/९५/ विनियम दि. १५ जून १९९५ मधील तरतुदीनुसार, बैठक भत्ता ( प्रत्यक्ष काम केलेल्या दिवसासाठी प्रतिदिन रु.५००/- प्रमाणे) देण्यात यावा. निवृत्त अधिकारी यांना आवश्यक प्रसंगी दौरा करावा लागल्यास त्यांना त्यांच्या निवृत्तीवेळ वेतनमानास अनुसरून प्रवासभत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८०२१५३२०६५४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=544e07f06fbab100dc2bfe33db79fc14350d78d6c16f8feab484d842c496717d, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2017.08.02 15:33:05 +05'30'

**( डॉ. संजय बेलसरे )**
शासनाचे उपसचिव

**प्रत माहितीसाठी -:**

१) मा.मंत्री ,जलसंपदा ,महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री ,जलसंपदा ,महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा) महाराष्ट्र मुंबई/ नागपूर
४) प्रधान सचिव (जलसंपदा) ,यांचे स्वीय सहाय्यक.
५) सचिव (लाक्षेवि), यांचे स्वीय सहाय्यक.
६) सचिव (प्रकल्प समन्वय), यांचे स्वीय सहाय्यक.
७) सर्व महासंचालक ,जलसंपदा विभाग
८) सर्व कार्यकारी संचालक ,जलसंपदा विभाग
९) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव ,जलसंपदा विभाग ,मंत्रालय ,मुंबई ३२
१०) आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११) सर्व मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग.
१२) सर्व अधीक्षक अभियंता व उप सचिव ,जलसंपदा विभाग ,मंत्रालय ,मुंबई ३२
१३) सर्व अधीक्षक अभियंता ,जलसंपदा विभाग.
१४) सर्व सदस्य, EstiCoM प्रणाली सनियंत्रण समिती
१५) उप समितीचे अध्यक्ष/ सदस्य
१६) निवड नस्ती (निवसं-३).